**शैक्षणिक वर्ष २०२०-२१ पासून राज्यात औषधनिर्माणशास्त्र पदविका अभ्यासक्रमांच्या नवीन संस्था सुरु करण्यास फार्मसी कौन्सिल ऑफ इंडीया,नवी दिल्ली यांनी दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने शासन मान्यता देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**

**शासन निर्णय क्र.मान्यता-२०२०/(प्र.क्र.५१/२०)तांशि-५**

मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,

हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०००३२.

दिनांक: १४ ऑगस्ट, २०२०.

**संदर्भ :** संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक १०/एनजीपी/२०२०/३८५, दिनांक ६ जुलै, २०२०.

**प्रस्तावना :-**

शैक्षणिक वर्ष २०२०-२१ पासून राज्यात औषधनिर्माणशास्त्र पदविका अभ्यासक्रमांच्या नवीन संस्था सुरु करण्यास फार्मसी कौन्सिल ऑफ इंडीया यांनी दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय यांनी संदर्भीय पत्रान्वये शासनास प्रस्ताव सादर केलेला आहे. सदर प्रस्तावाचे अनुषंगाने कायम विनाअनुदानित तत्वावर नवीन औषधनिर्माणशास्त्र पदविका अभ्यासक्रमांच्या संस्था सुरु करण्यास शासन मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

फार्मसी कौन्सिल ऑफ इंडीया यांनी दिलेल्या मान्यतेस अनुसरुन सोबत जोडलेल्या Annexture A मध्ये नमूद संस्थांना त्यांच्या नावासमोर दर्शविल्याप्रमाणे नवीन औषधनिर्माणशास्त्र पदविका अभ्यासक्रमांच्या संस्था सुरु करण्यास शैक्षणिक वर्ष २०२०-२१ पासून खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

१. सदर मंजूरी कायम विना अनुदान तत्वावर राहील.
२. प्रस्तुत बाबतीत अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद/ फार्मसी कौन्सिल ऑफ इंडीया, नवी दिल्ली यांनी विहित केलेल्या तसेच दिनांक २१ मे, १९८३ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या अटींची पूर्तता करणे संबंधित संस्थेस बंधनकारक राहील. सदर अभ्यासक्रमासाठी संस्थेची प्रवेश क्षमता विवरणपत्रातील त्यांच्या नावासमोर नमूद केल्याप्रमाणे मर्यादित राहील.
३. शासनाने विहित केलेल्या तसेच अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद/ फार्मसी कौन्सिल ऑफ इंडीया, नवी दिल्ली यांनी विहित केलेल्या सर्व अटी व शर्ती मान्य असल्याबाबत संस्थेस करारनामा करावा लागेल. तसेच संबंधित कागदपत्रांची आणि औपचारिक बाबींची पूर्तता संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य यांच्या संमतीने समाधानकारकरित्या करण्यात येईल.

४. सदर पदविका अभ्यासक्रमांसाठी संबंधित संस्थेने महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळाची संलग्नता घेणे आवश्यक आहे.

५. नव्याने मान्यता देण्यात आलेल्या पदविका औषधनिर्माणशास्त्र अभ्यासक्रमाच्या संस्थाप्रमुखांनी विद्यार्थ्यांना प्रवेश देण्यापूर्वी फार्मसी कौन्सील ऑफ इंडिया, नवी दिल्ली यांची मान्यता घेणे बंधनकारक राहील. सदर मान्यतेअभावी भविष्यात काही न्यायालयीन प्रकरणे उदभवल्यास याप्रकरणी संबंधित संस्था पूर्णपणे जबाबदार राहतील. तसे हमीपत्र संबंधित संस्थाप्रमुखांनी संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचेकडे सादर करावयाचे आहे. त्यानंतरच सदर संस्थांना अभ्यासक्रम सुरू करण्यासाठी संचालनालयाने संमती द्यावयाची आहे.

६. संबंधित संस्थेने संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचेकडे विहीत संचीत ठेव संयुक्त खात्यात भरुन इतर कायदेशीर बाबींची पूर्तता करावी.

७. सदर व्यावसायीक पदविका अभ्यासक्रमाचे प्रवेश शासनाने मान्य केलेल्या संबंधित अभ्यासक्रमांच्या प्रवेश नियमानुसार /पद्धतीनुसार करण्यात येतील.

८. शुल्क नियामक प्राधिकरणाने विहित केलेल्या शिक्षण शुल्कापेक्षा जास्त शुल्क संबंधित संस्थांनी आकारल्यास त्या संस्थांवर महाराष्ट्र एज्युकेशनल इन्स्टिट्यूशन (प्रोहिबिशन ऑफ कॅपिटेशन फी) ॲक्ट, १९८७ अनुसार कारवाई करण्यात येईल.

९. संस्थेने अभ्यासक्रम चालविण्यास पूर्णवेळ शिक्षकवृंद व इतर तांत्रिक कर्मचारी शासन नियमाप्रमाणे नियुक्त करावेत. त्यांना नियमानुसार वेतन व भत्ते देण्यात यावेत. तसेच शिक्षकवृंद व इतर कर्मचाऱ्यांच्या वेतन व भत्ते इत्यादीबाबत तसेच विद्यार्थ्यांकडून शासनाकडे तक्रारी आल्यास संस्थेवर कडक कारवाई करण्यात येईल.

१०.संस्थेतील ग्रंथालयास आवश्यक ती पुस्तके, नियतकालिके अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेच्या मानकानुसार खरेदी करणे आवश्यक आहे. तसेच विद्यार्थ्यांना वाचनालयाचा पुरेपूर उपयोग होण्याच्या दृष्टीने ग्रंथालयात विद्यार्थ्यांना अभ्यासिकेची सोय करणे आवश्यक आहे. तसेच विद्यार्थ्यांना अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेच्या मानकाप्रमाणे सर्व शैक्षणिक सोयीसुविधा (उदा. प्रयोगशाळा, वाचनालय, वर्गखोल्या इ.) करणे आवश्यक आहे.

११.सदर संस्था, संचालक, तंत्रशिक्षण यांच्या नियंत्रणाखाली राहिल व संबंधित अभ्यासक्रमांच्या परीक्षा महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, वांद्रे, मुंबई यांच्याकडून घेतल्या जातील.

१२.रॅगिंग संदर्भात मा. सर्वोच्च न्यायालयाचे निर्देश व महाराष्ट्र प्रोहिबिशन ऑफ रॅगिंग ॲक्ट, १९९९ यांची कठोरपणे अंमलबजावणी करणे आवश्यक राहील.

१३.याशिवाय संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई, महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, मुंबई व संबंधित विद्यापीठ यांनी घालून दिलेल्या अन्य अटी व शर्ती लागू राहतील.

१४.ज्या संस्थांनी संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य यांच्याकडे प्रोसेसिंग फी, नोंदणी शुल्क अदा केलेली नाही, त्या संस्थांकडून संचालकांनी अंतीम मान्यता देण्यापूर्वी ती वसूल करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००८१४११५४३७२४०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil Raghunath Katkar

Digitally signed by Anil Raghunath Katkar
DN: CN = Anil Raghunath Katkar, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Higher & Technical Education Department
Date: 2020.08.14 12:04:39 +05'30'

**(अ.र.काटकर)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.,
२. संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, मुंबई.,
३. सर्व सहसंचालक, तंत्र शिक्षण विभागीय कार्यालय., (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
४. संबंधित विद्यापीठांचे कुलसचिव., (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
५. सर्व संबंधित संस्था., (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
६. अतिरिक्त सचिव (तांत्रिक), भारत सरकार, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, ७ वा मजला, चंद्रलोक भवन, जनपथ, नवी दिल्ली - ११० ००१.,
७. फार्मसी काऊन्सिल ऑफ इंडिया, कम्बाइन्ड काऊन्सिल्स् बिल्डिंग, कोटला रोड, एजवान-इ-गालिब मार्ग, नवी दिल्ली-११० ००२.,
८. सहायक शिक्षण सल्लागार (तांत्रिक), भारत सरकार, मनुष्यबळ विकास मंत्रालय (शिक्षण भाग), नवी दिल्ली.,
९. विभागीय अधिकारी, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, पश्चिम विभागीय कार्यालय, इंडस्ट्रियल इन्शुरन्स बिल्डींग, २ रा मजला, चर्चगेट, मुंबई.,
१०.निवड नस्ती/तांशि-५.

# शासन निर्णय क्रमांक मान्यता-2020/(प्र.क्र.51/20)/ तांशि-5, दि. 14 ऑगस्ट, 2020 सोबतचे

## Annexure A

List of New Pharmacy Institute [Approved by Central Council of PCI A.Y. 2020-21]

| Sr no | PCI Code | Region | District | Name of the Trust with Address & Phone Numbers | Name & Address of the Proposed Institute & Phone Numbers | Name & Ph number of President / Secretary | Institute Status | PCI Approval | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | | | Name of Course | Level of Course | Intake |
| 1 | PCI - 3040 | Nashik | Jalgaon | Mahatma Phule Samajik & Shaikshanik Vikas Mandal, Samrat House, opp. LIC Office, Bhadgaon Road, Chalisgaon, Dist. Jalgaon 02589 - 223342 | Aditya Institute Of Pharmacy, Samrat Campus, Dhule Road, Chalisgaon. Dist. Jalgaon – 424 10 | Shri. Ashok Hari Khalane, Secretary 9422778345 | Unaided | Pharmacy | Diploma Course | 60 |
| 2 | PCI-3647 | Nashik | Jalgaon | Late Bapuso. Pundlik Kalu Patil Multipurpose Education Society, Gudhe's Tq. Bhadgaon, Dist Jalgaon-424105. | Shri. Sai Samarth Institute of Pharmacy, Near Sant Sena Temple, Balad Road, Tq. Bhadgaon, Dist. Jalgaon-424105. | Shri. Dadasaheb P. Patil. President Contact no. 9421888871 | Unaided | Pharmacy | Diploma Course | 60 |
| 3 | PCI-2054 | Pune | Kolhapur | Karmaveer Vitthal Ramji Shinde Shikshan Sanstha, Vadarge Road, Talula Gadhinglaj, Dist. Kolhapur-02327-222078 | Shivraj College of Pharmacy, Gadhinglaj, Vadarge Road, Taluka Gadhinglaj, District Kolhapur. | Mr. Anil Vitthalrao Krade, Secretary 02327-222078, 9881938832, 9421231636 | Unaided | Pharmacy | Diploma Course | 60 |
| 4 | PCI-2905 | Mumbai | Thane | Deep Paramedical Organisation | DPOS Nett College Of Pharmacy, Village Balkum Thane 400607 | Mr. Saad Khan,Secretary - 9867869243 | Unaided | Pharmacy | Diploma Course | 60 |